<u>विधानमंडळ कामकाज प्राथम्य</u>

**सार्वजनिक उपक्रम / महामंडळ / आयोग यांचे / वार्षिक प्रशासन लेखा अहवाल विधानमंडळास सादर करण्याच्या <u>कार्यपद्धतीबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: विमंअ-२०१५/प्र.क्र.११९/पाच,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २३ सप्टेंबर, २०१५

**संदर्भ** :- प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय यांचे पत्र क्रमांक ३८१२२/म.वि.स./अ, दिनांक ४ सप्टेंबर, २०१५.

## शा स न  प रि प त्र क

विविध अधिनियमांतर्गत असलेल्या तरतुदींनुसार प्रतिवर्षी महाराष्ट्र विधानमंडळास सादर करावयाचे सार्वजनिक उपक्रम / महामंडळ / आयोग यांचे वार्षिक प्रशासन / लेखा अहवाल, महाराष्ट्र विधानमंडळाच्या www.mls.org.in संकेतस्थळावर ( Website वर ) उपलब्ध करुन देण्याबाबतचा निर्णय घेतला असल्याचे महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाने संदर्भाधीन पत्रान्वये कळविले आहे.

२. उपरोक्त निर्णयानुसार सर्व मंत्रालयीन विभागांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, राज्य शासकीय सार्वजनिक उपक्रम, तसेच महामंडळे, आयोग यांचे यापुढील अहवाल महाराष्ट्र विधानमंडळच्या उक्त संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात येणार असल्यामुळे, त्या अनुषंगाने मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अखत्यारीतील सार्वजनिक उपक्रम / महामंडळे / आयोग यांचे संबंधित वार्षिक प्रशासन अहवाल / लेखा अहवाल या दस्तऐवजांची **<u>इलेक्टॉनिक आवृत्ती</u>** <u>(softcopy in pdf format)</u> **<u>स्कॅनिंग न करता २० MB किंवा त्यापेक्षा कमी साईज मध्ये</u>** महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयास उपलब्ध करुन द्यावी. तसेच, मंत्रालयीन विभागांनी विधानमंडळ सचिवालयाकडे सादर केलेल्या अहवालाच्या पुस्तक स्वरुपातील २५ छापील प्रती व त्याच्या १० सीडीज देखील विधानमंडळ सचिवालयास कार्यालयीन वापरासाठी उपलब्ध करुन द्याव्यात.

३. सर्व मंत्रालयीन विभागांकडून आगामी हिवाळी अधिवेशन, २०१५ पासून वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२३१२५६०७९४१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suhas Anantrao Deshpande

Digitally signed by Suhas Anantrao Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=602b3053d2d5715af6e36bc14492171797f6535d24cfb21b4c91e4cd563032bf, serialNumber=ab1c94477a634b6c4766f36e49fb2e268a6755445ea2fac5d7b3a8d9684f3ec3, cn=Suhas Anantrao Deshpande
Date: 2015.09.23 13:00:06 +05'30'

**(सु.अ.देशपांडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२. प्रधान सचिव / सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (अ-शाखा), विधानभवन मुंबई-४०००३२.
३. सर्व मंत्रालयीन विभाग.
४. निवड नस्ती.